अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी/सांख्यिकी अधिकारी, इत्यादी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील पदावर पदोन्नतीने दिलेली नियुक्ती नाकारल्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदोनि-१२१४/प्र.क्र. १३९ /का. १४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०३ डिसेंबर, २०१६

संदर्भ :- १) या विभागाचे समक्रमांकाचे दिनांक ८ सप्टेंबर, २०१५ चे आदेश.
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही १०८७/ ११३१/प्र.क.११-८९/बारा, दिनांक ३०/०४/१९९१

शासन आदेश

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन सहायकांना उपरोक्त संदर्भाधिन क्रमांक १ च्या कार्यालयीन आदेशान्वये संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गामध्ये पदोन्नती देण्यात आली होती. सदर आदेशामधील खालील संशोधन सहायकाने पदोन्नती नाकारली असल्याने त्यांचे नांव सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ३०/०४/१९९१ च्या शासन निर्णयानुसार पदोन्नती आदेशातून वगळण्यात येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | दिनांक ८ सप्टेंबर, २०१५ रोजीच्या आदेशातील अनुक्रमांक |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १. | श्रीमती व. व. तायडे (श्रीमती व. अ. गुरव) | १५ |

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक ३०/०४/१९९१ मध्ये “पदोन्नती नाकारल्यामुळे उद्भवणारे परिणाम व त्याबाबत अवलंबविण्याची कार्यवाही” याबाबत पुढीलप्रमाणे तरतूद केली आहे :-

> “वरच्या संवर्गात पदोन्नतीसाठी निवड झाल्यानंतर एखाद्या सेवकाने पदोन्नतीचे पद स्विकारण्यास नकार दर्शविल्यास त्याचे नांव पदोन्नतीसाठी पात्र असणाऱ्या सेवकांच्या निवड यादीतून काढून टाकण्यात यावे. पदोन्नतीसाठी पात्र असणाऱ्या कर्मचाऱ्यांची निवड यादी त्यानंतर जेव्हा बनविण्यात येईल, त्यावेळी त्या कर्मचाऱ्याच्या प्रकरणाचा गुणवत्तेप्रमाणे पुन्हा विचार करावा.”

उपरोक्त परिच्छेद १ मध्ये नमूद केलेल्या कर्मचाऱ्याने पदोन्नती नाकारल्यामुळे त्यांचेबाबत सदरहू तरतूद लागू होते. तरी त्यानुसार उचित कार्यवाही संचालनालय स्तरावरुन करण्यात यावी.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वेतन-११०९/प्र.क्र.४४/सेवा-३, दिनांक १ एप्रिल, २०१० अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्यात आली आहे. श्रीमती तायडे यांनी पदोन्नती नाकारली असल्याने जर त्यांना आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात आला असेल तर सदरहू शासन निर्णयातील परिच्छेद ३ नुसार उचित कार्यवाही संचालनालय स्तरावरुन करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०३११३१०५२७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vanita Narayan Jadhav

Digitally signed by Vanita Narayan Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f0e1884948542877a779b797fc357f1c34d84fe1aa3f9bdc30c060e0431223f, cn=Vanita Narayan Jadhav
Date: 2016.12.03 15:26:17 +05'30'

**( वनिता जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर.
३. मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे.
६. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
७. मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, पुणे
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई / पुणे .
११. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई / पुणे .
१२. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. अवर सचिव, शेतमाल भाव समिती कक्ष, कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय, पुणे.
१५. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२/१६-ब), मंत्रालय, मुंबई.
१६. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७. संबंधित कर्मचारी *
   * संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदरहू आदेश संबंधित कर्मचाऱ्यांना द्यावेत, ही विनंती.
१८. निवड नस्ती (का. १४२७).